“नवीन चंद्रपूर शहराचा विकास” या योजनेकरिता वित्तीय वर्ष २०२२-२३ करिता अर्थसंकल्पिय तरतूदीचे वितरण.

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्र.: नविच-२०२३/प्र.क्र.४/गृनिधो-१**

नविन प्रशासन भवन, ६ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : - २४ मार्च, २०२३

वाचा :- १) या विभागाचा समक्रमांकाचा दि.२०.०१.२०२३ रोजीचा शासन निर्णय.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२.
३)मुख्य अधिकारी, नागपूर गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, नागपूर यांचे क्र. नाम/मुअ/का.अ.-१/निधी/चंद्रपूर/४८/२०२३, दि.२७.०२.२०२३ रोजीचे पत्र.
४) मुख्य अधिकारी, नागपूर गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, नागपूर यांचे जा.क्र. मुअ/नाम/एसपीए/१८८५/२०२३, दि.१६.०३.२०२३ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :**

चंद्रपूर जिल्हयातील १३९१.७१ हेक्टर इतक्या क्षेत्रावर नवीन चंद्रपूर शहर बसविण्याचा शासनाने सन १९९८ मध्ये निर्णय घेतला आहे. नवीन चंद्रपूर येथील अधिसूचित विभागातील विकासाची कामे करण्यासाठी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण (म्हाडा) ची विशेष नियोजन प्राधिकरण म्हणून नियुक्ती करण्यात आलेली असून सदर प्राधिकरणाच्या नागपूर मंडळाकडून या योजनेची कामे कार्यान्वित करण्यात येत आहेत. या योजनेच्या विकास आराखडयास शासन अधिसूचना, नगर विकास विभाग, दि. ३० जून, १९९८ अन्वये मंजूरी प्रदान करण्यात आलेली आहे. म्हाडाकडून राबविण्यात येत असलेल्या सदर योजनेत नवीन चंद्रपूर वसाहत येथे विद्युत पुरवठा, पाणी पुरवठा, मुख्य रस्त्यांची कामे, भूसंपादनाची कामे व इरई नदीवरील पुलाचे काम इत्यादि कामांचा अंतर्भाव आहे. सदर योजना ही दिर्घपल्ल्याची योजना असुन निधीच्या उपलब्धतेनुसार राबविण्यात येत आहे. सदर योजने अंतर्गतच्या विविध कामांना म्हाडाकडून वेळोवेळी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. तसेच म्हाडा प्राधिकरणाने त्यांचा स्वत:च्या निधीही वितरित केला आहे.

मुख्य अधिकारी, नागपूर गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, नागपूर यांनी वाचा क्र. ३ येथील पत्रान्वये म्हाडा प्राधिकरणाने प्रस्तुत योजने अंतर्गत खर्च केलेल्या रु.१७९.७६ कोटी इतक्या रकमेची प्रतिपूर्ति होणे आवश्यक असल्याचे कळविले आहे. तसेच, वाचा क्र. ४ येथील दिनांक १६.०३.२०२३ च्या पत्रान्वये भूसंपादित केलेल्या जागेला कुंपणाकरिता रु.९.५० लक्ष इतक्या निधीची आवश्यकता असल्याचे कळविले आहे. नवीन चंद्रपूर शहर विकास योजनेकरीता सन २०२२-२३ आर्थिक वर्षात मागणी क्रमांक क्यू-३, मुख्य लेखाशिर्ष क्रमांक २२१६, गृहनिर्माण (०३) (०६) नवीन चंद्रपूर शहराच्या विकास, ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१६ ११०२) या लेखा शीर्षाअंतर्गत रु. ६५.०० कोटी इतकी अर्थसंकल्पिय तरतुद करण्यात आली आहे. सदर अर्थसंकल्पिय तरतूदीपैकी रु.१३,०७,४३,५५४/- इतका निधी वाचा येथील क्र.१ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. वित्त विभागाने बिम्स प्रणालीवर अर्थसंकल्पिय तरतूदीच्या ४९% म्हणजे रू.३१.८५ कोटी इतका निधी वितरीत केला आहे. त्यामुळे उपलब्ध करुन दिलेला उर्वरित रु.१८,७७,५६,४४६/- इतका निधी म्हाडा प्राधिकरणास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

नवीन चंद्रपूर शहर विकास योजने अंतर्गत सन २०२२-२३ आर्थिक वर्षात मागणी क्रमांक क्यू-३, मुख्य लेखाशिर्ष क्रमांक २२१६, गृहनिर्माण (०३) (०६) नवीन चंद्रपूर शहराच्या विकास, ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१६ ११०२) या लेखाशीर्षाअंतर्गत रु.१८,७७,५६,४४६/- (अक्षरी रुपये अठरा कोटी सत्याहत्तर लक्ष छप्पन्न हजार चारशे सेहेचाळीस फक्त ) इतका निधी खालील नमुद केल्याप्रमाणे, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास या आन्वये वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **कामाचे विवरण** | **उपलब्ध करुन देण्यात येत असलेला निधी** |
|---|---|---|
| १ | नविन चंद्रपूर शहर विकास योजने अंतर्गत म्हाडामार्फत खर्च करण्यात आलेल्या रक्कमेची शासनाकडून प्रतिपूर्तीची रक्कम | रु.१८,६८,०६,४४६/- |
| २ | भूसंपादीत करण्यात आलेल्या जागा सुरक्षित अतिक्रमण मुक्त ठेवण्याच्या अनुषंगाने कुंपणाकरीता लागणारा निधी. | रु.९,५०,०००/- |
| | **एकूण :-** | **रु.१८,७७,५६,४४६/-** |

२. सदर निधी ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेले आहे त्याच कारणांसाठी त्याचा विनियोग करणे आवश्यक आहे. तसेच सदर निधीतून होणाऱ्या खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र त्वरीत शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

३. सदर निधी वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई यांच्या स्वाक्षरीने अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरित करण्यात यावा. प्रस्तुत प्रकरणी आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी, वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई हे राहतील.

४. या बाबींवर होणारा खर्च मागणी क्रमांक क्यू-३, मुख्य लेखा शिर्ष "२२१६, गृहनिर्माण - ८०, सर्वसाधारण-१०३, गृहनिर्माण मंडळे, इत्यादींना सहाय्य, (०३) आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांना घरकुलासाठी अर्थसहाय्य - (०३) (०६) चंद्रपूर शहराच्या नवीन वसाहतीचा विकास (कार्यक्रम), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२१६ ११०२) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. हे आदेश वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संकेतांक २०२३०३२४२०१७१९७६०९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAVINDRA NARAYAN KHETLE

Digitally signed by RAVINDRA NARAYAN KHETLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT,
2.5.4.20=188518615e71d343f645c4620bd62f620f5f5af35f72932959997b73ec7e7c41, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=69DCF3660DD70A5F443CD1B17131804310A79BF3FE40409DFDA1FAD5E072E484, cn=RAVINDRA NARAYAN KHETLE
Date: 2023.03.24 20:23:02 +05'30'

**( रविंद्र खेतले )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल १/२, (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
२) महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
३) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकारण,गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई,
४) मुख्य अधिकारी, नागपूर गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, नागपूर,
५) वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकारण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व),मुंबई,
६) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई.
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८) उप सचिव (श्री.कवडे), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) अवर सचिव (गृनिधो-१/रोख शाखा/अर्थ व लेखा), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) कक्ष अधिकारी (अर्थ-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) कक्ष अधिकारी (अर्थ व लेखा), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवड नस्ती (गृनिधो-१).